**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअप १२१७/प्र.क्र.११९/१४ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ३० ऑगस्ट, २०१८

**आदेश :-**

मंत्रालयीन विभागातील खालील सहायक कक्ष अधिकारी (गट (ब) अराजपत्रित- वेतनश्रेणी रु.९३००-३४८००- ग्रेड पे रु. ४३००) यांना सन २०१७-२०१८ या निवडसूची वर्षासाठी कक्ष अधिकारी (गट(ब) राजपत्रित- वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० -ग्रेड पे रु. ४८००) पदावर या आदेशाद्वारे विहित अटीच्या अधीनतेने तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर सहायक कक्ष अधिकारी यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ-६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | नाव | प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. | उ.बा.भुजबळ | इमाव | ग्राम विकास विभाग | ग्राम विकास विभाग |
| २ | श्री. | श्री.च.यादव | खुला | महसूल व वन विभाग | महसूल व वन विभाग |
| ३ | श्री. | रा.चं.शिंदे | खुला | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग |

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा. उच्च न्यायालयाच्या निर्णया विरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधि व न्याय विभागाने दिनांक २८.१२.२०१७ रोजी खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सा.प्र.वि./कार्यासन १६-ब ने दिनांक २९.१२.२०१७ रोजीच्या पत्रान्वये दिल्या आहेत.

**त्यानुसार संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांची कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेली विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.** याशिवाय सदर तदर्थ पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

(अ) वरील सहायक कक्ष अधिकारी यांचेविरूध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही.

(ब) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.२९८२/२०००, क्र.२९८६/२०००, क्र.४९५८/२००३ व क्र.३३७४/२०११ मा.न्यायालयाने दिनांक ०६.०८.२०१८ रोजी निकाली काढल्या असून, मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार दिनांक ०१.०१.१९८६ पासूनच्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकीत कराव्या लागणार आहेत. मा.उच्च न्यायालयाने आपल्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या निर्णयास आठ आठवड्यांची स्थगिती दिली आहे. सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ च्या आदेशास अधिन राहून तसेच या संदर्भात मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण / मा.उच्च न्यायालय अथवा मा.सर्वोच्च न्यायालयाने काही आदेश पारित केले तर त्यास अधिन राहून देण्यात येत आहे.

(क) सदर तदर्थ पदोन्नती अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित कक्ष अधिकारी नियुक्त होईपर्यंत यापैकी जे लवकर घडेल तेवढ्या कालावधीकरिता असेल.

(ड) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ कक्ष अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी कक्ष अधिकारी संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन राहून सदर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

(इ) संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांची कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(ई) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांना नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा अन्य कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(फ) सदर पदोन्नत्या तदर्थ स्वरुपाच्या असून या पदोन्नत्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

३. संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांनी कक्ष अधिकारी पदाची तदर्थ पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१७-२०१८ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.

४. हे आदेश तत्काळ अंमलात येतील.

५. महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरणातील तरतुदीनुसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे संबंधितांवर बंधनकारक राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३०१५३८२९१८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.08.30 16:43:52 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित सहायक कक्ष अधिकारी (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१ अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

२ सह सचिव/उप सचिव (आस्थापना), सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग.

त्यांना विनंती करण्यात येते की, महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरणातील "नवीन विषयाची तोंडओळख प्रशिक्षण" या प्रशिक्षणांतर्गत पदोन्नत कक्ष अधिकाऱ्यांना आपल्या विभागामार्फत १ ते ३ दिवसांचे प्रशिक्षण देण्यात यावे.

३ कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र./१४,१४-अ

४ निवडनस्ती, का.क्र.१४-ब /संग्रहार्थ.